# महाराष्ट्र शासन

क्रमांक : गौखनि ५०अ/०२१९/प्र.क्र.२२/ख-२,

महसूल व वन विभाग
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२०

**विषय : गौण खनिज-गडचिरोली**
**मौजे रेंगुठामाल, ता. सिरोंचा या वाळूगटाची अनामत रक्कम परत करणेबाबत.**
**- मे.जे.एम.डी. असोसिएट, प्रो.प्रा. मनोहर मोटवानी**

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना उपरोक्त विषयाबाबतचे पत्र क्र.कार्या-२/अ.का.खनिज/ कावि/ ५०/२०१९, दि.१०/०१/२०१९, क्र.कार्या-२/अ.का.खनिज/कावि/८९१/२०१९, दि.१२/०९/२०१९, क्र. कार्या-२/अ.का.खनिज/कावि/२१/२०२०, दि.६/०१/२०२० रोजीच्या पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१५-१६ करीता मे.जे.एम.डी. असोसिएट, प्रो.प्रा. मनोहर मोटवानी यांनी मौजे रेगुंठामाल या वाळूगटाकरीता अनामत रक्कम रू.११,३०,८००/-शासनजमा केली. सदर ई-लिलावामध्ये मौजा रेगुंठामाल, ता. सिरोंचा हा वाळूगट मे.जे.एम.डी. असोसिएट, प्रो.प्रा. मनोहर मोटवानी यांना रूपये ५६,५४,०००/- एवढ्या सर्वोच्च बोलीने दि.११/१२/२०१५ रोजीच्या आदेशान्वये मंजूर केला. परंतु जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली यांची दि.७/१०/२०१५ रोजीच्या जाहिरातीस रिट याचिका क्र.५६६८/२०१५ व ५९११/२०१५ द्वारे आव्हानित करण्यात आल्याने मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी दि.२७/१०/२०१५ रोजीच्या आदेशान्वये न्यायालयाचे पुढील आदेशापर्यंत लिलाव प्रक्रियेस स्थगिती देण्यात आली.

मा. उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.५६६८/२०१५ व ५९११/२०१५ दि.७/१२/२०१५ रोजी खारीज करून रेतीघाट लिलावासंबंधी ई-निविदा काढण्यापुर्वी पर्यावरण मंजुरी देण्यात आली असल्याने सदर प्रकरणातील स्थिगिती आदेश उठविले होते. त्यानुसार सदर लिलावधारकास जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी लिलावाची सर्वोच्च बोलीची उर्वरीत रक्कम शासनजमा करून करारनामा करणेबाबत कळविण्यात आले. परंतु लिलावधारक यांनी सदर रकमेचा भरणा न केल्यामुळे जिल्हाधिकारी गडचिरोली यांनी दि.१७/०२/२०१६ रोजीच्या आदेशान्वये लिलावधारक यांची सदर वाळूगटाची भरणा केलेली अनामत रक्कम रू.११,३०,८००/- जप्त करण्यात आली.

जिल्हाधिकारी, गडचिरोली यांच्या दि.१७/०२/२०१६ रोजीच्या आदेशाविरूध्द लिलावधारक यांनी मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट याचिका क्र.३२/२०१७ मध्ये दि.४/०१/२०१९ रोजी लिलावधारकास दोन आठवड्यात सदर अनामत रक्कम परत करण्यात यावी. तसेच, दोन आठवड्यात रक्कम परत केली नाही तर १५ टक्के व्याज आकारण्यात येईल, असे आदेश पारीत केले. सदर आदेशाचे पालन न झाल्याने लिलावधारक यांनी मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे अवमान याचिका क्र.५७/२०२० दाखल केली.

३. मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र.३२/२०१७ मध्ये दिलेले आदेश तसेच लिलावधारकाने मा न्यायालयात दाखल केलेली अवमान याचिका क्र.५७/२०२० च्या अनुषंगाने लिलावधारक मे. जे.एम.डी. असोसिएट, प्रो.प्रा. मनोहर मोटवानी यांना रक्कम रू.११,३०,८००/- व त्यावरील व्याजाची रक्कम रू. १,८८,४६६/- इतकी रक्कम लिलावधारकास परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

४. मे. जे.एम.डी. असोसिएट, प्रो.प्रा. मनोहर मोटवानी यांना रक्कम रु.११,३०,८००/- व त्यावरील व्याजाची रक्कम रू.१,८८,४६६ अशी एकूण रक्कम रू.१३,१९,२६६/- (रुपये तेरा लाख एकोणवीस हजार दोनशे सहासष्ट फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व

यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

५. याबाबीवर होणारा खर्च रू.११,३०,८००/- सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून संबंधित लिलावधारक यांना अदा करण्यात यावी.

तसेच व्याजाची रक्कम रू. १,८८,४६६/- सन २०१९-२० या वर्षाकरीता "मागणी क्र.सी-१, "२०५३ जिल्हा प्रशासन" ०९३ (०१)-जिल्हा आस्थापना, (०१)- सर्वसाधारण आस्थापना, (०१)(०५) आयुक्त नागपूर (अनिवार्य)(दत्तमत), (२०५३ ०१०८) या लेखाशिर्षाखाली, १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

६. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५४/ २०२०/व्यय-९, दिनांक १५/०२/२०२० अनुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००२१७१८१०३१०११९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

GAJANAN DHARMA DABHILKAR

Digitally signed by GAJANAN DHARMA DABHILKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=c4f6398a3105d0cebbc1a00f25241de3304637656082108e1227c13033d76bfe,
postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=69c2bd0a657d8ab9b87341301d9ac56408774af7b6416010e1d362583c71ffd6, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=GAJANAN DHARMA DABHILKAR
Date: 2020.02.18 18:07:24 +05'30'

**( गजानन दाभिळकर )**
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी गडचिरोली, गडचिरोली.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
५) वित्त विभाग, (व्यय-९,अर्थसंकल्प -३, ६ व १४ कार्यासने) हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
७) निवडनस्ती ख कार्यासन, महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.